सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता नगर वन उद्यान (२४०६ A२०२) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सावंवि-२०१७/प्र.क्र.१०८/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : ७ डिसेंबर २०१८**

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र-अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८

२) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ सी/यो/ प्र.क्र.११/१३५९/२०१८-१९, दि. ०२.१०.२०१८.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक आणि मुख्य कार्यकारी ( महा कॅम्पा ) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र कक्ष-कॅम्पा/प्र.क्र.५३०(२)/५५७/२०१८-१९, दि.४.१२.२०१८

४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक सावंवि-२०१७/ प्र.क्र.१०८/ फ-११, दि.१३ सप्टेंबर २०१७

५) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक सावंवि-२०१७/ प्र.क्र.१०८/ फ-११, दि.२० मार्च २०१८

प्रस्तावना :-

National CAMPA Advisory Council यांच्या दिनांक ०८.०७.२०१५ रोजी झालेल्या ६ व्या बैठकीत नगर वन उद्यान योजना कार्यान्वित करण्याचा निर्णय झाला. सदर योजना प्रथमत: महानगरपालिका क्षेत्रातील वनक्षेत्रावर राववावयाची आहे. नगर वन उद्यान ही नवीन योजना असून राज्यातील एकूण ५ नगर वन उद्यानाकरिता रु.६६६.०० लक्षची योजना Ad Hoc CAMPA यांनी मंजूर केलेली आहे. राज्य शासनाने ( राज्य हिस्सा २०% ) रु. १३३.०० लक्ष इतका निधी उपलब्ध उपलब्ध करुन द्यावयाचा आहे. याकरिता सन २०१७-१८ च्या विधीमंडळाच्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे रु. १००.०० लक्ष अर्थसंकल्पित करण्यात आलेला होता. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात सुधारित अंदाजाच्या मर्यादेत संदर्भ क्रमांक ४ व ५ येथील शासन निर्णयांन्वये एकूण रु.८९.०० लक्ष इतका निधी वितरित करण्यात आलेला आहे. आता सदर योजनेच्या राज्य हिस्स्याची उर्वरित रक्कम रु. ४४.२० लक्ष इतका निधी वितरित करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक २ येथील पत्रान्वये शासनास प्राप्त झालेला आहे.

नगर वन उद्यान या योजनेकरिता सन २०१८-१९ साठी राज्य हिस्स्याकरिता रु.१८२.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्यापैकी वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील परिपत्रकान्वये ७० % च्या मर्यादेत रु. १२७.४० लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. त्या निधीमधून राज्य हिस्स्याची उर्वरित रु. ४४.२० लक्ष निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार वन विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या **"नगर वन उद्यान (२४०६ A २०२)"** हया योजनेकरिता सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात रु.१८२.००लक्ष इतका निधी अर्थसंकल्पिय अधिवेशनात अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यापैकी वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील परिपत्रकान्वये ७० % च्या मर्यादेत रु. १२७.४० लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. त्या निधीमधून राज्य हिस्स्याची उर्वरित **रु. ४४.२० लक्ष निधी** (०२ मजूरी-**रु. १३.३० लक्ष ,** २१ पुरवठा व सामग्री- **रु. १७.६० लक्ष व** ५० इतर खर्च -**रु. १३.३० लक्ष )** वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१७-१८ मध्ये खर्च केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करण्यात येईल या अटीवर सदर निधी वितरित करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम खर्च करण्यापूर्वी कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांनी तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी दिली असल्याची खात्री करण्यात येईल.

४. सदर कामे करताना वन ( संवर्धन ) अधिनियम १९८० चा भंग होणार नाही. याबाबत दक्षता घेण्यात येईल.

५. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

६. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

७. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

८. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**"मागणी क्र.सी-७,**

**२४०६ वनीकरण व वन्यजीवन,**

**११० वन्य जीवांचे संवर्धन**

**( ०२)(२५) नगर वन उद्यान ( २४०६ A२०२)**

**०२- वेतन,२१ - पुरवठा व सामग्री , ५० इतर खर्च "**

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२०७१६३२३८१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2018.12.07 16:39:09 +05'30'

( वीरेन्द्र तिवारी )

**अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( मंत्रालय )**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक ,सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसरंक्षक ( प्रा.) नागपूर/ कोल्हापूर/ पुणे / चंद्रपूर
५. वनसंरक्षक , सामाजिक वनीकरण वृत्त, नागपूर/ कोल्हापूर/ पुणे / चंद्रपूर
६. उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, नागपूर, कोल्हापूर, पुणे, चंद्रपूर
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवडनस्ती/फ-११.